बंदरातील भरीव गाळ उपसणी (३०५१ ०७३२) या योजनेसाठी सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत निधीपैकी रू.१.२३ कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीजीटी ०३२२/प्र.क्र.३०/बंदरे-२
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२२

संदर्भ:- १.शासन निर्णय क्र.बीजीटी-०६२१/प्र.क्र.५५/बंदरे-२ दि.३०.०६.२०२१

२. शासन निर्णय क्र. बीजीटी-०५२१/प्र.क्र.५१/बंदरे-२ दि.०३.१२.२०२१

३.महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र जा.क्र.ममेबो/मुकाअ/साआचिस/यां.आ/१४२२ दि.२४.०३.२०२२

४. शासन निर्णय वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.१४.१०.२०२१

५.शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.०३.०२.२०२२

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या “बंदरातील भरीव गाळ उपसणी” या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये रु.४०.६९ कोटी इतका अर्थसंकल्पीत करण्यात आला असून या रकमेपैकी ६०% च्या मर्यादेत रु.२४.४१ कोटी इतक्या रक्कमेस वित्त व नियोजन विभागाकडून मान्यता मिळालेली आहे. सदर निधीपैकी रु.२.८३ कोटी निधी दि.३०.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये व रु. २०.३५ कोटी निधी दि.०३.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित निधीपैकी रू.१.२३ कोटी इतका निधीस आता खालील कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १. | मार्वे मनोरी बंदरातील गाळ उपसणी | १.२३ कोटी |
| | एकूण | १.२३ कोटी |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१४.१०.२०२१ व दि.०३.०२.२०२२ च्या शासन निर्णय व परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदींचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकिय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२२ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावी.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-७, ३०५१- बंदरे व दिपगृहे, ०० ०२ लहान बंदरे, (८०) सर्वसाधारण, (१९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (०१) मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान, (०१) (०५) बंदरात मोठ्या प्रमाणात गाळ उपसणी (राज्य) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (३०५१ ०७३२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५५/२०२२/व्यय-८, दि.३०.०३.२०२२ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०३३११२१८३५४५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2022.03.31 12:21:18 +05'30'

**(निलीमा कांबळे)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.